राज्यातील अल्पसंख्याक लोकसमूहातील उमेदवारांकरिता सुरू करण्यात आलेल्या "मौलाना आझाद मोफत शिकवणी व संबध्द योजना" या योजनेंतर्गत खाजगी प्रशिक्षक संस्थांची निवड करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. मोशियो-२०१३/प्र.क्र. ९२/का-९**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ९ मार्च २०१५.

**वाचा:-**

१) **शासन निर्णय क्रमांक:** राअआ-२०१२/१०८/प्र.क्र.१८/का-९, दिनांक २५ जून, २०१३.
२) **शासन निर्णय क्रमांक:** मोशियो-२०१४/प्र.क्र.१३/का-९, दिनांक २२ ऑगस्ट, २०१४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पसंख्याक लोकसमूहातील उमेदवारांना शासकीय/निमशासकीय सेवेत संधी उपलब्ध करण्याकरिता केंद्रिय लोकसेवा आयोग/महाराष्ट्र लोकसेवा आयोग/बँकींग सेवा भरती इत्यादी स्पर्धा परीक्षांसाठी तसेच व्यावसायिक अभ्यासक्रमांमधील प्रवेशाकरिता घेण्यात येणाऱ्या सामाईक प्रवेश परीक्षांच्या पूर्व तयारीसाठी आणि इयत्ता १० वी व १२ वी अनुत्तीर्ण अल्पसंख्याक उमेदवारांकरिता विशेष शिकवणी वर्ग सुरू करण्याकरीता दि. २५ जून, २०१३ च्या शासन निर्णयान्वये "मौलाना आझाद मोफत शिकवणी व संबध्द योजना" कार्यान्वित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. या योजनेंतर्गत राज्यातील मुंबई, ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या शहरांमध्ये प्रशिक्षण केंद्रांची सुविधा उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. सदर योजनेच्या अनुषंगाने प्रशिक्षण देण्याकरीता खाजगी प्रशिक्षण संस्थाकडून अर्ज मागविण्यात आले होते. सदर संस्थांपैकी मुंबई, नाशिक, अमरावती व नागपूर येथील पात्र संस्थांची निवड करण्यात आली आहे. पुणे व ठाणे येथील अर्ज प्राप्त संस्थांपैकी पात्र संस्थांची निवड करण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"मौलाना आझाद मोफत शिकवणी व संबध्द योजना" या योजनेंतर्गत राज्यातील पुणे व ठाणे या केंद्रात उपरोक्त अभ्यासक्रमांतर्गत प्रशिक्षण देण्याकरिता खाली नमूद केलेल्या संस्थांची निवड करण्यात येत आहे. संबंधित संस्थांना ज्या अभ्यासक्रमांतर्गत प्रशिक्षण द्यावयाचे आहे त्या अभ्यासक्रमाचे नाव व विद्यार्थ्यांची संख्या संबंधित संस्थेपुढे दर्शविण्यात आलेले आहे.

| अ.क्र. | केंद्र | अभ्यासक्रम | संस्था | विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | पुणे | केंद्रिय लोकसेवा आयोग स्पर्धा परीक्षा (UPSC) | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकडमी, नाशिक | ३५ |
| | | महाराष्ट्र राज्य लोकसेवा आयोग स्पर्धा परीक्षा (MPSC) (राजपत्रित) | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकडमी, नाशिक | ३५ |
| | | महाराष्ट्र राज्य लोकसेवा आयोग स्पर्धा परीक्षा (MPSC) (अराजपत्रित) | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकडमी, नाशिक | ७५ |
| | | बँकींग सेवा स्पर्धा परीक्षा | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकडमी, नाशिक | ३५ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | सामाईक प्रवेश परीक्षा | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकॅडमी, नाशिक | ३५ |
| | | इ. १० वी अनुत्तीर्ण विद्यार्थ्यांकरिता विशेष शिकवणी वर्ग | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकॅडमी, नाशिक | १०० |
| | | इ. १२ वी अनुत्तीर्ण विद्यार्थ्यांकरिता विशेष शिकवणी वर्ग | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकॅडमी, नाशिक | १०० |
| २ | ठाणे | केंद्रिय लोकसेवा आयोग स्पर्धा परीक्षा (UPSC) | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकॅडमी, नाशिक | २० |
| | | | शेतकरी शिक्षण प्रसारक मंडळ, मुंबई | २० |
| | | महाराष्ट्र राज्य लोकसेवा आयोग स्पर्धा परीक्षा (MPSC) (राजपत्रित) | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकॅडमी, नाशिक | २० |
| | | महाराष्ट्र राज्य लोकसेवा आयोग स्पर्धा परीक्षा (MPSC) (अराजपत्रित) | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकॅडमी, नाशिक | २० |
| | | बँकींग सेवा स्पर्धा परीक्षा | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकॅडमी, नाशिक | ३० |
| | | सामाईक प्रवेश परीक्षा | शेतकरी शिक्षण प्रसारक मंडळ, मुंबई | ४० |
| | | | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकॅडमी, नाशिक | ४० |
| | | | नायक ट्युट्योरियल प्रा.लि. , ठाणे | २० |
| | | इ. १० वी अनुत्तीर्ण विद्यार्थ्यांकरिता विशेष शिकवणी वर्ग | शेतकरी शिक्षण प्रसारक मंडळ, मुंबई | १०० |
| | | | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकॅडमी, नाशिक | १०० |
| | | | नायक ट्युट्योरियल प्रा.लि. , ठाणे | १०० |
| | | इ. १२ वी अनुत्तीर्ण विद्यार्थ्यांकरिता विशेष शिकवणी वर्ग | शेतकरी शिक्षण प्रसारक मंडळ, मुंबई | १०० |
| | | | प्रबोधन बहुउद्देशीय संस्था संचलित सायन्स ॲकॅडमी, नाशिक | १०० |
| | | | नायक ट्युट्योरियल प्रा.लि., ठाणे | १०० |

२. वरील प्रशिक्षण वर्गांमध्ये प्रवेशासाठी उमेदवारांकरिता पात्रतेचे सर्वसाधारण निकष व प्रशिक्षणाच्या अटी खालीलप्रमाणे राहतील. १) उमेदवार धार्मिक अल्पसंख्याक (मुस्लिम, बौध्द, जैन, ख्रिश्चन, शीख व पारसी) समाजातील असावा. २) उमेदवार महाराष्ट्र राज्याचा अधिवासी असावा. ३) या प्रशिक्षणाचा लाभ फक्त प्रशिक्षणापुरता असेल, उमदेवारांना निवासाची व्यवस्था स्वत: करावी लागेल. ४) एकूण प्रशिक्षणार्थी उमेदवारांपैकी ३०% जागा मुलींसाठी राखीव असतील. जर प्रशिक्षण संस्थेने प्रशिक्षणासाठी विहित केलेल्या मानकांची पूर्तता करणाऱ्या पुरेशा अल्पसंख्याक मुली उपलब्ध होऊ शकल्या नाहीत तर मुलींसाठी राखीव असलेल्या जागा संबंधित अल्पसंख्याक प्रवर्गातील मुलांमधून समायोजित करण्यात येतील.५) प्रशिक्षण योजनेसाठी उमेदवारांची निवड गुणवत्तेनुसार करण्यात येईल. मात्र समान गुण मिळाल्याच्या परिस्थितीत ज्या उमेदवारांचे वार्षिक कौटुंबिक उत्पन्न कमी असेल अशा उमेदवारांना प्रशिक्षणासाठी प्राधान्य देण्यात येईल व याकरिता तहसिलदार किंवा विशेष कार्यकारी अधिकारी यांनी दिलेला उत्पन्नाचा दाखला ग्राहय धरण्यात येईल.

३. या योजनेचा लाभ घेऊ इच्छिणाऱ्या उमेदवारांना प्रत्येक प्रशिक्षण अभ्यासक्रमासाठी (लोकसेवा स्पर्धा परीक्षा/बँकींग स्पर्धा परीक्षा/सामाईक प्रवेश परीक्षा/इ. १० वी व १२ वी परीक्षा) दि. २५ जून, २०१३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या सर्व अटी व शर्थीची पूर्तता करणे आवश्यक राहिल.

४. या योजनेची परिणामकारक अंमलबजावणीकरिता निवड करण्यात आलेल्या प्रशिक्षण संस्थांवर खालीलप्रमाणे जबाबदाऱ्या राहतील:-

१) प्रशिक्षणासाठी अल्पसंख्यांक प्रवर्गनिहाय विहित करण्यात आलेल्या जागांनुसार उमेदवारांची यादी तयार करणे आणि या शासन निर्णयामध्ये विहित करण्यात आलेल्या तरतूदीनुसार गुणवत्तेवर आधारित व विहित उत्पन्न मर्यादेनुसार उमेदवारांची प्रशिक्षणासाठी प्राथमिकता ठरविणे. नोडल एजन्सी वेगवेगळया प्रशिक्षण कार्यक्रमासाठी उमेदवारांकरिता विहित करण्यात आलेल्या पात्रतेच्या निकषांची पूर्तता करणाऱ्या इच्छूक उमेदवारांकडून ऑन लाईन प्रवेशाकरिता जाहिरात देईल.

२) संबंधित भरती परीक्षेकरिता विहित करण्यात आलेल्या पात्रता परीक्षेमध्ये अर्जित केलेल्या गुणांनुसार किंवा प्रवेश परीक्षेच्या माध्यमातून नोडल एजन्सी पात्र व निवडलेल्या उमेदवारांची गुणवत्ता यादी तयार करील. मात्र उमेदवारांना समान गुण मिळाल्याच्या परिस्थितीत ज्या उमेदवाराच्या कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न अन्य उमेदवारांच्या तुलनेत कमी असेल, त्या उमेदवारास प्रशिक्षण कार्यक्रमास प्रवेशाकरिता प्राधान्य देण्यात येईल. उमेदवारांची निवड करताना दि. २५ जून, २०१३ च्या शासन निर्णयान्वये अल्पसंख्याक लोकसमुदायासाठी विहित करण्यात आलेल्या प्रमाणकानुसार उमेदवारांची निवड करण्यात यावी.

३) एखाद्या अल्पसंख्याक लोकसमुदायातील उमेदवार उपलब्ध न झाल्यास, त्याऐवजी अन्य अल्पसंख्याक लोकसमुदायातील उमेदवारास प्रवेश देण्यात यावा, एखाद्या अल्पसंख्याक लोकसमुदायातील पुरेशा मुली उपलब्ध होऊ शकल्या नाहीत तर, मुलींसाठी राखीव असलेल्या जागा संबंधित अल्पसंख्याक प्रवर्गातील मुलांमधून समायोजित करण्यात येतील.

४) प्रशिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचा हजेरीबाबत मासिक व तिमाही अहवाल शासनाच्या अल्पसंख्याक विकास विभागास सादर करणे.

५) प्रशिक्षित उमेदवारांचा आधारकार्ड क्रमांकासह डाटाबेस ठेवणे, उमदेवारांशी संपर्क व समन्वय ठेवणे, निवड झालेल्या उमेदवारांच्या नावांची यादी शासनास सादर करणे व संबंधित संस्थेच्या संकेत स्थळावर (वेबसाईटवर) ही माहिती प्रदर्शित करणे.

६) आवश्यकता असल्यास प्रसंगानुरुप उमेदवारांची चाळणी परीक्षा घेणे.

७) या योजनेअंतर्गत प्रवेश दिलेल्या विद्यार्थ्यांना केंद्रशासनाच्या या अथवा इतर योजनेअंतर्गत प्रवेश न देण्याची संस्थेने खबरदारी घेणे आवश्यक राहील. तसेच संस्थेने प्रवेश दिलेल्या विद्यार्थ्यास अन्य संस्थेने याच योजनेखाली प्रवेश दिलेला नाही याची देखील संबंधीत संस्थांनी खात्री करून घ्यावी.

५. प्रशिक्षणार्थी उमेदवारांची प्रशिक्षण वर्गातील किमान ८५% उपस्थिती विचारात घेऊन प्रत्यक्षात परीक्षेस बसलेल्या उमेदवारांच्या प्रमाणात दि. २५ जून, २०१३ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेल्या दरानुसार व टप्पानिहाय अनुदानाचे वितरण संबंधित प्रशिक्षण संस्थांना करण्यात येईल.

६. वरील संस्थांची निवड ३ वर्षासाठी म्हणजेच सन २०१४-१५ ते सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षाकरीता करण्यात येत आहे. मात्र ज्या संस्थेचा निकाल ०% लागेल त्या संस्थेची मान्यता रद्द करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०३०९१३२०४८०८१४ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995, postalCode=400032, st=Maharashtra, cn=GANGURDE SANJAY SURYAKANT
Date: 2015.03.09 13:31:07 +05'30'

(सं.सु.गांगुर्डे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

सर्व संबंधित संस्था (पत्राने)

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय,
६. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
७. महालेखापाल , १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. महासंचालक, यशदा, पुणे
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, (प्रसिध्दीसाठी)
११. सर्व जिल्हाधिकारी,
१२. संचालक, तंत्रशिक्षण / व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण / वैद्यकीय शिक्षण / उच्च शिक्षण / शालेय शिक्षण
१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
१५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१६. सर्व मा. मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
१७. सर्व मंत्रालयीन विभाग,
१८. विभागातील सर्व अधिकारी / कार्यासने,
१९. निवडनस्ती (कार्यासन-९)